अनुसूचित जाती प्रवर्गाकरीता सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून निधी वितरीत करणेबाबत.
केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी१८८) ६० टक्के
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०१बी१९७) ४० टक्के

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२२/प्र.क्र. २७/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २४ मार्च, २०२२

**वाचा :-**
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१ व २८.१.२०२२
2) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.No.३-१ /२०१५-M&T (I&P), दि.१०.०.२०२२.
3) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.कृयायो-२०२२/प्र.क्र.२० (भाग-२) /१४-अे

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत कृषि उन्नती योजना, कृषी यांत्रिकीकरण उपअभियान या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१ पीक संवर्धन, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (११) कृषी उन्नती योजना कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१८८, ३३-अर्थसहाय्य खाली रु.२४००.०० लाख तर (०१) (१२) ) कृषी उन्नती योजना कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१९७, ३३-अर्थसहाय्य खाली रु.१६००.००लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. अर्थसंकल्पीय तरतूदीमधून केंद्र हिश्श्याचा रु. ६००.०० लाख व राज्य हिश्श्याचा रु. ४००.०० लाख निधी खर्च करण्यात आला आहे.

२. संदर्भाधीन क्र.२ अनुसार केंद्र शासनाच्या दि. १०.०१.२०२२ च्या पत्रान्वये कृषी उन्नती योजना कृषी यांत्रिकीकरण उप अभियान अंतर्गत अनुसूचित घटकांकरीता पहिल्या हप्त्यापोटी रु. १८००.०० लाख एवढा निधी शासकीय कोषागारात जमा केलेला आहे. यास्तव कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ च्या नस्तीवरील प्रस्तावास वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील अनुक्रमे दिनांक १४/१०/२०२१ व दि. २८/०१/२०२२ रोजीच्या परिपत्रकातील निधी वितरणाच्या मार्गदर्शक सूचनाच्या अनुषंगाने वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन सन २०२१-२२ करीता अर्थसंकल्पीत तरतूदीतून (०१) (११) कृषी उन्नती योजना कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१८८, ३३-अर्थसहाय्य याकरिता रु.१८००.०० लाख समरुप (०१) (१२) ) कृषी उन्नती योजना कृषी यांत्रिकीकरण उप अभियान (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी१९७, ३३-अर्थसहाय्य याकरिता रु.१२००.०० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषी व पदुम) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

४. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१४.१०.२०२१ व दि. २८.१.२०२२ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१४.१०.२०२१ व दि. २८.१.२०२२ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१८३/ दि.२५.२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२४१५०५५०४४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.03.24 15:07:33 +05'30'

( प्रशान्त पुं. वाघ )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.